**महाराष्ट्र राज्य लॉटरी**
महाराष्ट्र मिनी या साप्ताहिक सोडतींच्या बक्षिसरचना व कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१४/प्र.क्र.७५ / लॉटरी-२ ,

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: ५ ऑगस्ट, २०१४.

**वाचा :**

शासन निर्णय क्र. मरालॉ २०१२ / प्र.क्र. ४७ /लॉटरी -२, दिनांक.०८.०५.२०१२.

**शासन निर्णय :**

**महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडत** ही केंद्र शासनाचा लॉटरी नियम- २०१० प्रमाणे कार्यान्वित केलेली आहे. महाराष्ट्र राज्य पारंपारिक लॉटरीच्या साप्ताहिक सोडती राष्ट्रीय सणाव्यतिरिक्त इतर सर्व दिवशी काढण्यात येतात त्याच प्रमाणे महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडती माहे **०१ सप्टेंबर,२०१४** पासून नव्याने सुरु करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे.

२. महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडत या सोडतीच्या तिकीटाचे मूल्य रू. **१०/-** असून पहिले बक्षिस **रू. १ लाख** इतके असून प्रोत्साहनपर बक्षिस **रू.५,०००/- ची** ५ बक्षिसे ठेवण्यात आली आहेत. या सोडतीसाठी **६** मालिका असून प्रत्येक मालिकेत १०,००० प्रमाणे एकूण ६० हजार तिकीटे मुद्रित करण्यात येतील. प्रत्येक मालिकेतील तिकीटांचे क्रमांक ०००० ते ९९९९ या प्रमाणे देण्यात आलेले आहेत. महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडत या सोडतीची तिकीट विक्री करणाऱ्या विक्रेत्यास रू. १०,०००/- व त्याखालील असणाऱ्या सर्व बक्षिसांचे प्रदान तिकीट विजेत्यास केल्याबद्दल विक्रेत्यांना २% सेवाआकार देण्यात येईल.

३. महाराष्ट्र शासनाने या सोडतीची तिकीट विक्री शिवडी कार्यालयामार्फत करण्याचा निर्णय घेतलेला आहे. त्यानुसार महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडत या सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, क्लॅरेज हाऊस, हाजी बंदर रोड, शिवडी (पू), मुंबई-४०००१५ येथून राज्य लॉटरीच्या सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील.

४. या सोडतीची तिकीट विक्री करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांच्या एका पुस्तकावरील (M.R.P. Rs.१०/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर खरेदी करण्यात आलेल्या या सोडतीच्या एकूण लॉटरी तिकीटांवर पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

| तिकीटांची संख्या | घाऊक सूट |
|---|---|
| ५०० ते १०,००० | २०% |
| १०,००१ ते २०,००० | २२% |
| २०,००१ ते ३०,००० | २६% |
| ३०,००१ ते ६०,००० | २८% |

जे अभिकर्ते सोडतीच्या एकूण २५% पेक्षा जास्त तिकीटांची खरेदी करतील त्यांना शासन निर्णय वित्त विभाग क्र. मरालॉ २०१२/ प्र क्र ४७/लॉटरी-२, दिनांक ०८/५/२०१२ मधील अटी व शर्तीनुसार २% विशेष सूट देण्यात येईल.

**५.** या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उप संचालक (वि.व ले.) महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडत या सोडतीची तिकीट छपाई **मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स, प्रा. लि.**, फरिदाबाद यांचेकडून करून घेण्यात येतील. या तिकीटाचे आकारमान १८ x ८ cms असून यासाठी ९० GSM क्रोमा आर्ट पेपर वापरण्यात येऊन त्याचा दर प्रती १ लाख तिकीटाकरिता रू. १८,८१०/- असा राहील.

**६.** घाऊक अभिकर्त्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक अभिकर्त्याने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या शिवडी कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

**७.** या सोडतीची बक्षिसरचना व बक्षिसे निश्चित करण्याची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे राहील.

**महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडती**
**सोमवार (डायमंड), मंगळवार (रूबी), बुधवार (पर्ल),**
**गुरूवार (गोल्ड), शुक्रवार (सिल्व्हर) व शनिवार (प्लॅटिनम)**

मालिका : **६**
तिकिटांचे क्रमांक: ०००० ते ९९९९
सोडत दिनांक : ०१/०९/२०१४ पासून
वेळ : दुपारी : ३. ३० वा.

प्रत्येक मालिकेत १०००० तिकीटे
एकूण तिकीटे : ६० हजार
तिकीटांची किंमत : रू.१०/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम | प्रत्येक मालिकेतील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकां-तील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकां-तील बक्षिसांची एकूण रक्कम | विक्रेत्यास बोनस | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|
| पहिले सामायिक बक्षिस (पूर्ण क्रमांक) | १,००,००० | -- | १ | १,००,००० | ५,००० | १,००,००० |
| प्रोत्साहनपर बक्षिस (पहिल्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित मालिकांसाठी पहिल्या बक्षिसाचा क्रमांक) | ५,००० | १ | ५ | २५,००० | -- | २५,००० |
| दुसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) (दोन जुळवण्या) (प्रत्येक मालिकेसाठी) | १,००० | २ | १२ | १२,००० | -- | १२,००० |
| तिसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) (दहा जुळवण्या) | ५०० | -- | ६० | ३०,००० | -- | ३०,००० |
| चौथे बक्षिस (पूर्ण क्रमांक) (दहा जुळवण्या) | २०० | -- | ६० | १२,००० | -- | १२,००० |
| पाचवे बक्षिस (पूर्ण क्रमांक) (दहा जुळवण्या) | १०० | -- | ६० | ६,००० | -- | ६,००० |
| सहावे बक्षिस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणा-या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी १० व्या क्रमांकास) | २० | -- | ६००० | १,२०,००० | -- | १,२०,००० |
| **एकूण** | **--** | **--** | **६१९८** | **३,०५,०००** | **५,०००** | **३,०५,०००** |

**८. <u>सोडतीची कार्यपध्दती :-</u>**

साप्ताहिक **महाराष्ट्र मिनी साप्ताहिक सोडत** या सोडतीकरीता सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा ठिकाणी ५ ड्रम ठेवण्यात येतील. प्रत्येक मालिकेमध्ये ०००० ते ९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. पहिल्या ड्रममध्ये मालिकाचे क्रमांक व उर्वरित ४ ड्रममध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे दहा चकत्या टाकण्यात येतील. पंचमंडळाच्यासमोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम्स एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या

क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील. या सोडतींतील बक्षिसे काढण्याचा क्रम खालीलप्रमाणे राहील.

८.१ **दुसरे बक्षिस रू. १,०००/-** दुसऱ्या रू.१,०००/- च्या बक्षिसासाठी एक पूर्ण अंकाची एक जुळवणी अशा दोन जुळवण्या प्रत्येक मालिकेत स्वतंत्रपणे काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल, अशी सर्व त्या त्या मालिकेतील तिकीटे या बक्षिसासाठी पात्र असतील.

८.२ **तिसरे बक्षिस रू. ५००/-** तिसरे बक्षिस रू.५००/- च्या बक्षिसासाठी ४ ड्रममधून पूर्ण अंकाची एक जुळवणी या प्रमाणे दहा जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल, अशी सर्व तिकीटे या बक्षिसासाठी पात्र असतील.

८.३ **चौथे बक्षिस रू. २००/-** चौथे बक्षिस रू.२००/- च्या बक्षिसासाठी ४ ड्रममधून पूर्ण अंकाची एक जुळवणी या प्रमाणे दहा जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल, अशी सर्व तिकीटे या बक्षिसासाठी पात्र असतील.

८.४ **पाचवे बक्षिस रू. १००/-** पाचवे बक्षिस रू.१००/- च्या बक्षिसासाठी ४ ड्रममधून पूर्ण अंकाची एक जुळवणी या प्रमाणे दहा जुळवण्या स्वतंत्ररित्या काढण्यात येतील. ज्या तिकीटाच्या शेवटी अशी अंकाची जुळवणी आली असेल, अशी सर्व तिकीटे या बक्षिसासाठी पात्र असतील.

८.५ **सहावे बक्षिस रू.२०/-** सहाव्या रू.२०/-च्या बक्षिसासाठी कोणत्याही ४ अकांचा एक क्रमांक काढण्यात येईल, त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १० क्रमांकास रू.२०/- सहावे बक्षिस सर्व मालिकांसाठी घोषित करण्यात येईल.

८.६ **पहिले बक्षिस रू.१,००,०००/-** या साप्ताहिक सोडतीमध्ये ६ मालिका असून रू. १,००,०००/- चे एक पाहिले सामायिक बक्षिस ठेवण्यात आले आहे. यासाठी प्रथमत: ६ मालिकांमधून एक भाग्यवान मालिका निश्चित करण्यात येईल. त्यासाठी प्रत्येक मालिकेची अद्याक्षरे व क्रमांक असलेली प्रत्येकी एक चकती घेण्यात येऊन ती प्रत्येक चकती स्वतंत्र प्लास्टीक / रबरी आवरणात घालून पंच मंडळासमोर स्वतंत्र ड्रममध्ये ठेवली जाईल. अध्यक्षानी घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम फिरविला जाईल व पुन्हा घंटी वाजवून इशारा केल्यावर ड्रम थांबविण्यात येइल. ड्रम मधून एकच पिशवी (पाऊच) बाहेर काढून त्यातून चकती बाहेर काढण्यात येईल व ती पंच मंडळासमोर दाखविण्यात येईल. अध्यक्ष त्या चकतीवरील मालिकेच्या अद्याक्षरांची घोषणा करतील. त्यानंतर वरील परिच्छेद क्रमांक ८ मध्ये विहित केलेल्या पध्दतीने भाग्यवान क्रमांक काढण्यात येईल.

८. ७ **प्रोत्साहनपर बक्षिस रू.५,०००/- :** या प्रोत्साहनपर बक्षिसासाठी पहिल्या क्रमांकाच्या बक्षिसाची मालिका वगळून उर्वरित ५ मालिकांकरिता पहिल्या बक्षिसासाठी निश्चित करण्यात आलेल्या भाग्यवान क्रमांकास रू.५,०००/- प्रोत्साहनपर बक्षिस देण्यात येईल.

९. या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ प्रकाशने व बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च मागणी क्र.जी-२,२०७५,संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००)१०३ राज्य लॉटरी,लॉटरी संचालनालय (२०७५०४७२)(००)(०१) प्रमुख लॉटरी ०५ बक्षिसे या लेखाशिर्षामधील उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

**१०.** पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वासनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**११.** या सोडतीत कोणत्याही मालिकेमध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

**१२.** या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

**१३.** महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक / एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

**१४.** वर नमूद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिसविजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याच प्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

**१५.** सदरच्या सोडतीची कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.वले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पू), मुंबई-१५ या कार्यालयाकडून करण्यात येईल व याबाबतची सर्व जबाबदारी त्यांची राहील.

**१६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२०१२४१४७४२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajitsingh Ramsingh Rajput

Digitally signed by Ajitsingh Ramsingh Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Directorate of Lotteries, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajitsingh Ramsingh Rajput
Date: 2014.08.20 12:38:59 +05'30'

**( अ. रा. राजपुत )**
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग,
तथा राज्य लॉटरी अधिकारी.

**प्रत,**

१. मा. उप मुख्यमंत्री तथा मंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.

२. मा. मंत्री , गृह, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री, वित्त, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव (लॉटरी), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
६. प्रधान सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.
७. पोलीस महासंचालक (कायदा व सुव्यवस्था) मुंबई यांचे स्वीय सहायक.
८. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९. आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
१०.महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
११.महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे स्वीय सहायक.
१२.उप सचिव,राज्य लॉटरी यांचे स्वीय सहायक.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५.उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी, शिवडी (पूर्व) मुंबई १५.
१६.कक्ष अधिकारी, प्रशा-४, लॉटरी-३, लेखा अधिकारी, लॉटरी, मंत्रालय, मुंबई.
१७. निवड नस्ती, लॉटरी -२.